**राष्ट्रीय कुटुंब लाभ योजनेअंतर्गत लाभ मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक: विसयो-२०२०/प्र.क्र.१७/विसयो**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक -: २१ सप्टेंबर, २०२०.

वाचा :-

१. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र.राकुला-२०१२/प्र.क्र.२७७/विसयो-२, दिनांक १२.०३.२०१३.
२. शासन पत्र क्रमांक, रासायो-१०१९/प्र.क्र.३७/विसयो-१, दिनांक २८.०९.२०००.

**शासन परिपत्रक :-**

केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय सामाजिक सहाय्य कार्यक्रमाखालील राष्ट्रीय कुटुंब लाभ योजनेंतर्गत दारिद्रयरेषेखालील कुटूंबाच्या यादीत नोंद असलेल्या १८ ते ५९ वयोगटातील (६० वर्षापेक्षा कमी) कर्ता स्त्री/पुरुष मरण पावल्यास त्याच्या कुटूंबियांना एक रकमी रुपये २०,०००/- इतके अर्थसहाय्य देण्यात येते.

दारिद्रयरेषेखालील कुटूंबातील कर्ता स्त्री/पुरुष मृत्यु पावल्यानंतर राष्ट्रीय कुटुंब लाभ योजनेचा लाभ मिळण्यासाठी त्याच्या कुटूंबियांनी मृत्युच्या दिनांकापासून १ वर्षाच्या आत अर्ज स्विकारण्याची मुदत दिनांक २८.०९.२००० रोजीच्या शासन पत्रान्वये देण्यात आली आहे. आता सदरहू योजनेकरिता दारिद्रयरेषेखालील कुटूंबातील कर्ता स्त्री/पुरुष मृत्यु पावल्यानंतर कुटूंबियांनी मृत्युच्या दिनांकापासून १ वर्षाऐवजी ३ वर्षाच्या आत अर्ज स्विकारण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे. विहीत मुदतीनंतर आलेले अर्ज मंजूर करु नयेत.

अर्जदाराच्या अर्जांची छाननी काटेकोरपणे करावी. तसेच पात्र अर्जदारांनाच या योजनेअंतर्गत अर्थसहाय्य मिळेल याची दक्षता संबंधित अधिकारी/ कर्मचारी यांनी घ्यावी.

सदर शासन परिपत्रकाची अंमलबजावणी शासन परिपत्रक निर्गमित केल्याच्या दिनांकापासून करण्यात यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०२००९२११६५५४८४९२२ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Sunil Vitthal Ukirade

Digitally signed by Sunil Vitthal Ukirade
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Welfare Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f1675ab906bc1ceaccfbc91a08ebb1af88bab8226074b0ac8613e6304e94f278, serialNumber=902164c64c3fba37f940b9e5a180d28dd1440382e63e7302a5e29f41123a9b06, cn=Sunil Vitthal Ukirade
Date: 2020.09.21 16:56:54 +05'30'

**( सु. वि. उकिरडे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. विभागीय आयुक्त, पुणे/कोकण/नाशिक/नागपूर/अमरावती व औरंगाबाद
२. सर्व जिल्हाधिकारी.

३. संचालक, लेखा व कोषागारे, नवीन प्रशासकीय भवन, ५ वा मजला, महाराष्ट्र राज्य ,मुंबई
४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई (२ प्रती)
५. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
६. महालेखापाल, महाराष्ट्र १/२, (लेखा परिक्षा / लेखा अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
७. वित्त विभाग, अर्थसंकल्प ३ ,४, ५ अर्थोपाय व व्यय १४, मंत्रालय, मुंबई.
८. सह सचिव (अर्थसंकल्प), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. सहाय्यक संचालक (वित्त व लेखा), लेखापरिक्षण कक्ष, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.मा.राज्यमत्री/मंत्री (सामाजिक न्याय व विशेष सहाय्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
११.निवड नस्ती, विसयो.